3

20140828160303323

**महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या शासन अंगीकृत उपक्रमांस सन २००८-०९ या आर्थिक वर्षात प्रसिध्दी करिता सहाय्यक अनुदान मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,
शासन निर्णय, क्रमांक टीडीएम-२००८/९/प्र.क्र.३६५/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक - २४ फेब्रुवारी, २००९.

**वाचा:-** १) सहव्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित यांचे क्रमांक मपविम/लेखा/भा.अ./

**शासन निर्णय :-** सन २००८-०९ या आर्थिक वर्षाकरिता महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित, मुंबई या शासन अंगीकृत उपक्रमास राज्यातील पर्यटन स्थळांच्या प्रसिध्दीसाठी माहे डिसेंबर २००८ च्या अधिवेशनात रुपये ५.०० कोटी (रुपये पाच कोटी फक्त) एवढी तरतूद अर्थसंकल्पित झाली आहे. सन २००८-०९ मध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रुपये ५,००,००,०००/- (रुपये : पाच कोटी फक्त) **वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.**

२. या अर्थसंकल्पिय तरतूदींचे वाटप खालील अटी व शर्तीवर महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास अदा करण्यास शासन याद्वारे मान्यता देत आहे.

अ) प्रसिध्दीकरिता मंजूर करण्यात आलेल्या निधीबाबत महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने प्रथम त्यांच्या योजना शासनास मान्यतेस्तव सादर कराव्यात. शासन स्तरावर पर्यटन प्रसिध्दी विषयक धोरण ठरवून विविध माध्यमाद्वारे राज्यातील सर्व पर्यटन स्थळांची आणि पर्यटन विषयक वैशिष्टयांची योग्य तऱ्हेने प्रसिध्दी व्हावी, याकरिता या रकमेचा विनियोग करावयाचा आहे. त्यामुळे एकसंध आणि संपूर्ण महाराष्ट्रातील पर्यटन स्थळांच्या संदर्भातील प्रसिध्दीमध्ये एकसूत्रता रहावी आणि दर्जेदार जाहिराती तयार व्हाव्यात याकरिता महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने योजनांची आखणी करुन त्या मंजूरीस्तव शासनाकडे सादर कराव्यात.

ब) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुम देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तिय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तिय मान्यता घेणे आवश्यक आहे.

क) अशा प्रत्येक योजनेच्या करावयाच्या बांधकामा संदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तिय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती अवलंबिणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.संकीर्ण १००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र.५, दि.६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल, याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेद्वारे तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.डीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/ वित्तिय सुधारणा, दि.१०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

ड) मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याबाबतची सर्व जबाबदारी संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेवर राहील आणि जादा खर्चाची प्रतिपूर्ती शासनाकडून केली जाणार नाही.

३. वरील परिच्छेद क्र.२ प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या सहाय्यक अनुदानावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष **"मागणी क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, ०१ पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०४) प्रसिध्दी (३४५२ १९३ १) ३१ सहायक अनुदाने"** या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २००८-०९ या आर्थिक वर्षातील मंजूर केलेल्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा."

४. वरील परिच्छेद क्र. २ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या सहाय्यक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरित करण्याकरिता श्री.आ.बा.डमाळे, कार्यासन अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री. किरण कुरुंदकर, सहसचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यांनी वरील निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या सहायक अनुदानाची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून "महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्यादित, मुंबई" (MAHARASHTRA TOURISM DEVELOPMENT CORPORATION LTD., MUMBAI) या नांवावर धनादेशाद्वारे काढून संबंधितांना वितरित करण्याची कार्यवाही करावी.

५. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-एक, शासन निर्णय क्र. विअप्र १०००/प्र.क्र. ४६/२००१ दि. ११ जुलै २००१ मधील अनु. क्र. २७ नियम क्र. १४९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( आ.बा.डमाळे )
कार्यासन अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,
महाराष्ट्र शासन

प्रति,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग ( का.साउ/ अर्थोपाय, व्यय-१४) मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग ( का.१४१२) मंत्रालय, मुंबई,
मा.मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
मा.राज्यमंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ मर्या., मुंबई
कार्यासन सां.का.- अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सां.का. विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती